१ ऑक्टोंबर-जागतिक जेष्ठ नागरिक दिवस साजरा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : जेष्ठना २०१८ /प्र.क्र. २५३/सामासु**
१४२ (वि.), मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक :- २७ सप्टेंबर, २०१८.

<u>वाचा:-</u> शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक जेष्ठना २०१६/प्रक्र.७१/सामासू, दि.९ जुलै, २०१८

**<u>शासन परिपत्रक-</u>**

भारताच्या संविधानातील राज्य धोरणाची निदेशक तत्वावरील अनुच्छेद ३९क व ४१ मध्ये ज्येष्ठ नागिरक सुस्थितीत असावा अशी तरतूद आहे. ज्येष्ठ नागरिकांचे समाजातील स्थान विचारात घेता त्यांना वृध्दापकाळ चांगल्या तऱ्हेने घालविता यावा, समाजामध्ये त्यांचे जीवन सुसह्य व्हावे, शारिरीक/मानसिक आरोग्य सुस्थितीत रहावे, वृध्दापकाळामध्ये त्यांच्या आर्थिक क्षमता, कामाचा हक्क, शिक्षणाचा हक्क आणि सार्वजनिक मदत मिळविण्यासाठी राज्याचे सर्वसमावेशक धोरण दि.९ जुलै, २०१८ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहे.सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार १ ऑक्टोंबर हा दिवस राज्यात जागतिक जेष्ठ नागरिक दिवस ( International Day of Senior Citizen) साजरा करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

त्यानुसार राज्यात सर्व ठिकाणी १ ऑक्टोबर हा दिवस जागतिक जेष्ठ नागरिक दिवस म्हणून साजरा करण्यात यावा व त्यानिमित्ताने वृत्तपत्रात जाहिराती देणे,सार्वजनिक पदयात्रा, प्रभात फे-या, सभा विशेष कार्य केलेल्या जेष्ठांचा व जेष्ठ नागरिकांसाठी काम करणा-या बिगर सरकारी संस्थांचा सत्कार व गौरव इ.कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे.

प्रस्तुतचे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०९२७१६२६१३९०२२ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by S.G. Patil
Date: 2018.09.27 16:31:34 +05'30'

( सं. गि. पाटील )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) मा.मंत्री (सा.न्या) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
२) मा.सचिव (सा.न्या.)यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई.
३) आयुक्त,समाजकल्याण,पुणे
४) सर्व जिल्हाधिकारी
५) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण
६) सर्व सहाय्यक आयुक्त,समाजकल्याण
७) सह सचिव (सामासु) , मंत्रालय,मुंबई.